वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग दुसरा राज्य पोलीस दलाचे कामकाज सुरळीतपणे पार पाडण्यासाठी वित्तीय अधिकारात वाढ करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमआयएस१०१८/प्र.क्र.४८/अर्थसं-१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. ०९ ऑगस्ट, २०१८

**वाचा:**-गृह विभाग,शासन निर्णय क्र. एमआयएस २४०८/प्र.क्र.१६४/२००८/बीयुडी-१,दि.२२ मे,२०१२

**प्रस्तावना:**

राज्य पोलीस दलास कायदा व सुव्यवस्था राखण्याच्या दृष्टिने व गुन्हेगारीस आळा घालण्याकरीता करीता नेहमीच सज्ज रहावे लागते.राज्यातील पोलीसांवरील ताण दिवसेंदिवस वाढत आहे. महाराष्ट्र राज्यात व्हीआयपी/ व्हीव्हीआयपी तसेच गणपती बंदोबस्त, धार्मिक सण, सभा यासारख्या बंदोबस्तावेळी कायदा व सुव्यवस्था अबाधित राखण्यासाठी तसेच अचानक उद्भवलेल्या कायदा व सुव्यवस्थेच्या परिस्थितीत तातडीने व कार्यक्षमरित्या कार्यवाही करणे आवश्यक असते.त्याअनुषंगाने उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयांन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्य पोलीस दलास कायदा व सुव्यवस्था राखण्याच्या दृष्टीने व गुन्हेगारीस आळा घालण्याकरीता तसेच, अचानक उद्भवलेल्या कायदा व सुव्यवस्थेच्या परिस्थितीत तातडीने व कार्यक्षमरित्या कार्यवाही करण्यासाठी या विभागाच्या दि.२२ मे,२०१२ च्या शासन निर्णयातील अ.क्र.३ येथील वित्तीय अधिकारात सदर शासन निर्णयासोबतच्या **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार गृह विभाग व या विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांच्या वित्तीय अधिकारात वाढ करण्यास शासन मंजुरी देत आहे.

२. हे आदेश सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. प्रस्तुत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्धतेच्या अधीन राहतील.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३७९/२०१८/विनियम,दि.०३/०७/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०८१०१२३९३३१७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil J Sovitkar

Digitally signed by Sunil J Sovitkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d8ee31cf28155a3c297f1c4b60ba7aa7197b86c24ce4eb660c798a1afe6f9cc, cn=Sunil J Sovitkar
Date: 2018.08.18 16:02:47 +05'30'

**( सु.ज.सोवितकर )**
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक,दहशतवाद विरोधी पथक,मुंबई.
४) अपर पोलीस महासंचालक,नक्षलविरोधी अभियान,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
५) अपर पोलीस महासंचालक, (नि. व स.),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
६) विशेष पोलीस महानिरीक्षक,मोटार परिवहन, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्ग सह).
८) अपर पोलीस आयुक्त,मोटार परिवहन,मुंबई.
९) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक (लोहमार्ग सह).
१०) सर्व प्राचार्य,पोलीस प्रशिक्षण शाळा.
११) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-१/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर.
१२) संचालक,लेखा व कोषागारे ,मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) वित्त विभाग (अर्थ-११/व्य-७/व्यय-८),मंत्रालय,मुंबई.
१७) गृह विभाग (पोल-४),मंत्रालय,मुंबई.
१८) निवड नस्ती (अर्थसं-१).

गृह विभाग शासन निर्णय क्रमांक एमआयएस-१०१८/प्र.क्र.४८/अर्थसं-१ दि. ९ ऑगस्ट, २०१८ च्या सोबतचे

**प्रपत्र-अ**

**गृह विभागांच्या अधिपत्याखाली पोलीस महासंचालक व इतर प्राधिकारी यांना भाग-२ मध्ये वित्तिय अधिकार प्रदान करण्याबाबत.**

| अ.क्र. | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम प्राधिकारी | वित्तीय शक्तीची मर्यादा | | | अटी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | अस्तित्वात असलेली वित्तीय मर्यादा | विभागाने प्रस्तावित केलेली वित्तीय मर्यादा | वित्त विभागाने मंजूर केलेली वित्तीय मर्यादा | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | | १)प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार | पूर्ण अधिकार | पूर्ण अधिकार | |
| | अ‍ॅन्टी-लँडमाईन /वॉटर कॅनन /बुलेट-प्रुफ कार/बुलेट-प्रुफ महिंद्रा टुरिस्टर बस (बी पी व्हेईकल) /मार्क्समन (महिंद्रा स्कॉर्पिओ )/मोबाईल कंट्रोल /किचन व्हॅन /कमांड पोस्ट व्हेईकल /हिप्पो/टाटा क्रेन/कॉम्बी टँकर प्युजल ब्राउजर / वज्र या व अशा प्रकारच्या अवजड व विशिष्ट प्रयोजनांसाठी वापरण्यात येणाऱ्या वाहनांची दुरुस्ती व देखभाल खर्चास प्रशासकीय मान्यता देणे. प्रशासकीय मान्यतेनंतर विहित पध्दतीने सेवा संविदा करार व दुरुस्ती प्रक्रिया पूर्ण करणे, करारात ठरल्याप्रमाणे खर्चास मान्यता देणे. | २) विभाग प्रमुख | पेट्रोल – रु.६०,०००/-(प्रति वर्ष प्रत्येक वाहनासाठी) | १) पोलीस महासंचालक<br><br>२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई<br>(प्रति वाहन प्रति वर्ष रु.१०.०० लक्ष पर्यंत दरवर्षी ५% वाढ प्रति वाहन)<br>-------------------------<br><br>१)जिल्हा पोलीस अधीक्षक,<br>२) समादेशक राज्य राखीव पोलीस बल.<br>३) प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र (प्रस्तावित)<br>४) अपर पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई (प्रति वाहन प्रतिवर्ष रु.२.०० लक्ष पर्यंत दरवर्षी २% वाढ प्रति वाहन | पेट्रोल व डिझेल वाहनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी प्रति वाहन प्रतिवर्ष रु. १०.०० लक्ष पर्यंत.<br>----------------------<br><br>पेट्रोल व डिझेल वाहनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी प्रति वाहन प्रतिवर्ष रु. २.०० लक्ष पर्यंत. | १)खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.<br>२) आवश्यक निधी उपलब्ध असला पाहिजे.<br>३) सर्वसाधारण निर्देशांचे, खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे. |